महाराष्ट्र राज्य लॉटरी
महाराष्ट्र सहयाद्री (रक्षाबंधन विशेष)
या मासिक सोडतीची बक्षिसरचना व
कार्यपध्दतीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
### शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१४/ प्र.क्र. ५४ /लॉटरी-२

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०२ जुलै, २०१४

वाचा : १) शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/ लॉटरी -२,दिनांक ०८/०५/२०१२.

## शासन निर्णय :

**"महाराष्ट्र सहयाद्री मासिक सोडत"** केंद्र शासनाचा लॉटरी (विनियमन) नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित करण्यात येत आहे. ही पारंपारिक लॉटरीची माहे ऑगस्ट-२०१४ ची मासिक सोडत दिनांक १२/०८/२०१४ रोजी सायं. ४.०० वा काढण्यात येईल.त्यानंतर ही योजना महाराष्ट्र सह्याद्री या सोडतीकरिता माहे सप्टेंबरपासून पुढे चालू राहिल.

२. या सोडतीच्या तिकिटाचे मूल्य **रु.५०/-** असून प्रत्येक मालिकेत **१,००,००० तिकीटे** असलेल्या **५** मालिकांत एकूण **५** लाख तिकीटे मुद्रीत करण्यात येतील. या सोडतीतील प्रत्येक मालिकेमध्ये तिकीटांचे क्रमांक ००,००० ते ९९,९९९ या प्रमाणे असतील. या सोडतीमध्ये **पहिले बक्षिस रू.२५ लाखांची (पूर्ण क्रमांक ,कोणत्याही दोन मालिकांसाठी) दोन बक्षिसे** अशी एकुण **५० लाखांची बक्षिसे** ठेवण्यात आली आहेत. "**महाराष्ट्र सहयाद्री मासिक**" सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू.), मुंबई-१५ यांचे कार्यालयातून सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील. या बक्षिसरचनेतील रु.१०,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान तिकिट विक्रेत्यांस केल्याबद्दल विक्रेत्यांना २ % सेवाआकार देण्यात येईल.

३. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावरील (M.R.P. Rs.५०/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांवर पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| अ.क्र. | तिकीटांची संख्या | घाऊक सूट |
|---|---|---|
| १ | ५०० ते ३०,००० | २० % |
| २ | ३०,००१ ते ५०,००० | २२ % |
| ३ | ५०,००१ ते ७५,००० | २६ % |
| ४ | ७५,००१ ते १,००,००० | २८ % |
| ५ | १,००,००१ तिकीटांच्या पुढे | ३०% |

अभिकर्त्यांना देण्यात येणा-या २% विशेष सूटीबाबतच्या अटी व शर्ती शासन निर्णय वित्त विभाग क्र.मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/लॉटरी-२,दिनांक ०८/०५/२०१२ नुसार लागू राहील

४. या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ यांचे कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. या सोडतीची तिकीट छपाई मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रेस प्रा. लि., फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येईल. या तिकीटाचे आकारमान २४ x १३ cms असून यासाठी कागदाचा दर्जा १३० GSM Indian Art Paper वापरण्यात येऊन त्याचा दर प्रती एक लाख तिकीटाकरिता रू. ४६,३०९/- असा राहील.

५. घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्यांने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या शिवडी कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

६. या मासिक सोडतीची बक्षिसरचना पुढीलप्रमाणे राहील.

**महाराष्ट्र सहयाद्री (मासिक) सोडत,(रक्षाबंधन विशेष)**

मालिका : ५
प्रत्येक मालिकेत : १,००,००० तिकिटे
तिकीटांचे क्रमांक ००,००० ते ९९,९९९
एकूण तिकिटे : ५ लाख
सोडत दिनांक: दि.१२/०८/२०१४, सायं. ४.०० वा
तिकीटाची किंमत : रू. ५०/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम | प्रत्येक मालिके-तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकां-तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| पहिले बक्षिस(पूर्ण क्रमांक) (कोणत्याही दोन मालिकांसाठी) | २५,००,००० | -- | २ | ५०,००,००० |
| दुसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (पहिल्या बक्षिसाच्या मालिका वगळून उर्वरित ३ मालिकांसाठी) | २,००,००० | -- | ३ | ६,००,००० |
| तिसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (प्रत्येक मालिकेसाठी) | १००,००० | १ | ५ | ५,००,००० |
| चौथे बक्षिस (२ पूर्ण क्रमांक) (प्रत्येक मालिकेत) | १०,००० | २ | १० | १,००,००० |
| पाचवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (प्रत्येक मालिकेत) | ५,००० | १० | ५० | २,५०,००० |

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| सहावे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (प्रत्येक मालिकेत) | २,००० | १० | ५० | १,००,००० |
| सातवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (१० जुळवण्या) | १००० | -- | ५०० | ५,००,००० |
| आठवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (२० जुळवण्या) | ५०० | -- | १००० | ५,००,००० |
| नववे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी १० व्या क्रमांकास) | १०० | -- | ५०,००० | ५०,००,००० |
| **एकूण** | | | **५१,६२०** | **१,२५,५०,०००** |

७. **सोडतीची कार्यपध्दती :-**

या सोडतीकरीता सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा ठिकाणी ६ ड्रम ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये ००,००० ते ९९,९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे क्रमांक असतील, उर्वरित ५ ड्रममध्ये ० ते ९ अंकांची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे १० चकत्या टाकण्यात येतील . पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील व तो क्रमांक विजेता क्रमांक म्हणून घोषित केला जाईल.

**७.१ तिसरे बक्षिस रू. १,००,०००/-** तिसऱ्या रू. १,००,०००/- च्या बक्षिसाकरिता ५ पूर्ण भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील.

**७.२ चौथे बक्षिस रू. १०,०००/-** चौथ्या रु. १०,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकांचे दोन क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येतील.

**७.३ पाचवे बक्षिस रू. ५,०००/-** पाचव्या रु. ५,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाची एक वेगवेगळी जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५,०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

७.४ **<u>सहावे बक्षिस रू. २,०००/-</u>** सहाव्या रु. २,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाची एक जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल अशी सर्व तिकीटे रू. २,०००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

७.५ **<u>सातवे बक्षिस रू. १०००/-</u>** सातव्या रु. १०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाची एक जुळवणी या प्रमाणे १० जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल अशी सर्व तिकीटे रू. १०००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

७.६ **<u>आठवे बक्षिस रू. ५००/-</u>** आठव्या रु. ५००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून ४ अंकाची एक जुळवणी या प्रमाणे २० जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल अशी सर्व तिकीटे रू. ५००/- च्या आठव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

७.७ **<u>नववे बक्षिस रू. १००/-</u>** नवव्या रु. १००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रममधून कोणताही ४ अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १० व्या क्रमांकास रू. १००/- चे नववे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

७.८ **<u>पहिले बक्षिस रू. २५,००,०००/-</u>** या मासिक सोडतीमध्ये **५ मालिकात मिळून रूपये २५ लाखांची दोन बक्षीसे** अशी एकुण **५० लाखांची बक्षिसे** ठेवण्यात आली आहेत. त्यासाठी प्रथमत: ५ मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी(पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ७ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने पहिल्या बक्षिसाचा पहिला भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.अशा प्रकारे पहिल्या बक्षिसाची मालिका व क्रमांक निश्चित झाल्यानंतर पहिल्या बक्षिसाचा दुसरा भाग्यवान क्रमांक काढण्यासाठी पहिल्या बक्षिसाची विजेती मालिका वगळून उर्वरित ४ मालिकांमधून पहिल्या बक्षिसाचा दुसरा क्रमांकही वरील परिच्छेद ७ मध्ये विहित केलेल्या पध्दतीनेच काढण्यात येईल.

**<u>७.९ दुसरे बक्षिस रु. २,००,०००/-</u>** दुसरे बक्षिस रू.२,००,०००/- या करिता सोडतीमधील रू. २५ लाखाचे पहिले बक्षिस मिळालेल्या २ भाग्यवान **मालिका वगळून** उर्वरित ३ मालिकांसाठी परिच्छेद ७ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने ३ पूर्ण अंकांचे भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेकरिता स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल.

८. या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००)१०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२)(००)(०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

९. पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

१०. या सोडतीमध्ये कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

११. या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

१२. महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

१३. वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

१४. सदरच्या सोडती कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहील.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०७२४१६०१२०४५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh Ramsingh Rajput

Digitally signed by Ajitsingh Ramsingh Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Directorate of Lotteries, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajitsingh Ramsingh Rajput
Date: 2014.07.24 16:00:23 +05'30'

**(अ. रा. राजपुत)**
कक्ष अधिकारी तथा राज्य लॉटरी अधिकारी.

प्रति,

१. मा. उपमुख्यमंत्री , मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री , गृह, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.

३. मा. राज्यमंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था) मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
८. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
९. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
११. उप सचिव,राज्य लॉटरी यांचे स्वीय सहायक.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/अर्थसंकल्प लॉटरी, वित्त मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.